दीर्घ सुटी विभागामध्ये सेवेत असलेल्या व्यक्तींना अर्जित रजा.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक: अरजा-2496/25/सेवा-9,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 6 डिसेंबर, 1996.

## शासन निर्णय

दीर्घ सुटी विभागामध्ये सेवेत असलेल्या व्यक्तींना महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 च्या नियम 54 मधील तरतुदीनुसार अर्जित रजा अनुज्ञेय आहे. सदरहू तरतुदींमध्ये सुधारणा करण्याचा प्रश्न काही काळ शासनाच्या विचाराधीन होता. यासंबंधात शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

1. (अ) शासकीय तसेच, जिल्हा परिषद शाळेतील दीर्घ सुटी विभागामध्ये कार्यरत असलेल्या शिक्षक, प्राचार्य, मुख्याध्यापक, ग्रंथपाल, प्रयोगशाळा सहाय्यक व पाणीवाला यांना सध्या अनुज्ञेय असलेल्या एकूण वीस दिवस अर्धवेतनी रजेऐवजी प्रत्येक कॅलेंडर वर्षात दहा दिवस अर्जित रजा अनुज्ञेय राहील.

(ब) ही अर्जित रजा संबंधित कर्मचा-यांच्या रजा खाती प्रत्येक कॅलेन्डर वर्षाच्या जानेवारी आणि जुलै महिन्याच्या पहिल्या दिवशी प्रत्येकी पाच दिवस याप्रमाणे दोन हप्त्यांमध्ये आगाऊ जमा करण्यात यावी. संबंधित कर्मचारी कॅलेन्डर अर्धवर्षाच्या शेवटच्या दिवशी रजेवर असेल तर तो कर्मचारी रजा संपल्यानंतर कामावर परत रुजू होण्याची वाजवी शक्यता आहे अशी रजा मंजूर करण्या-या सक्षम प्राधिका-याची खात्री पटली असेल तरच पुढील कॅलेन्डर अर्धवर्षामध्ये अर्जित रजा आगाऊ जमा करण्यात यावी.

(क) संबंधित कर्मचा-यांनी अर्धवर्षामध्ये असाधारण रजा घेतली असेल किंवा त्यांच्या गैरहजेरीचा कालावधी 'अकार्यदिन' म्हणून समजण्यात आला असेल तर अशा असाधारण रजेच्या/अकार्यदिन कालावधीच्या 1/30 या प्रमाणात, कमाल पाच दिवसांपर्यन्त, अर्जित रजा कमी करण्यात यावी.

(ड) संबंधित कर्मचा-यांची नियुक्ती किंवा सेवा समाप्ती अर्ध्या कॅलेन्डर वर्षाच्या मध्येच झाली असेल तर त्या अर्धवर्षामध्ये तो जेवढी पूर्ण कॅलेन्डर महिने सेवा करणार आहे/करण्याची शक्यता आहे, त्या प्रत्येक पूर्ण कॅलेन्डर महिन्याला 5/6 दिवस या प्रमाणात त्याच्या खाती अर्जित रजा जमा करण्यात यावी.

(इ) सुधारित पध्दती अंमलात येणा-या तारखेच्या लगतपूर्वीच्या दिनांकापर्यन्त सध्या प्रचलित असलेल्या पध्दतीने अर्धवेतनी रजा जमा करण्यात यावी व ती वेगळी दाखवून पूर्वीच्या अटी व शर्तीनुसार अर्धवेतनी, परिवर्तित याप्रमाणे मंजूर करण्यात यावी.

(ई) अनर्जित रजा खर्ची टाकावयाची शिल्लक आहे अशा प्रकरणी सुधारित पध्दती अंमलात आल्यानंतर संबंधित कर्मचा-याच्या अर्जित रजेच्या खाती, दोन अनर्जित रजेसाठी एक अर्जित रजा, याप्रमाणे खर्ची टाकण्यात यावी.

(उ) सुधारित पध्दती अंमलात आल्यानंतर फक्त अर्जित रजा अनुज्ञेय होणार असल्याने परिवर्तित रजा किंवा अनर्जित रजा अनुज्ञेय होणार नाही.

(ऊ) महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 च्या नियम 73 मधील तरतुदीनुसार अर्जित रजा प्रत्यार्पित करण्याची मुभा दिली जाणार नाही.

2. वर परिच्छेद 1 मधील अटींच्या अधीन राहून दीर्घ सुटी विभागामध्ये सेवेत असलेल्या शासकीय कर्मचा-यांना महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 मधील नियम 54 च्या तरतुदीनुसार पूर्वीप्रमाणेच अर्जित रजा अनुज्ञेय राहील. शाळेमध्ये कार्यरत असलेल्या शिक्षक, प्राचार्य, मुख्याध्यापक, ग्रंथपाल, प्रयोगशाळा सहाय्यक व पाणीवाला या कर्मचा-यांना वरील परिच्छेद 1 (अ) प्रमाणे देय होणा-या अर्जित रजेच्या व्यतिरिक्त नियम 54 च्या तरतुदीनुसार अर्जित रजा अनुज्ञेय राहील.

(कृ.मा.प.)

3. दीर्घ सुटी विभागामध्ये सेवेत असलेल्या व्यक्तींच्या अर्जित रजेच्या खाती मागील अर्ध्या वर्षाच्या अखेरीस जमा असलेली अर्जित रजा, पुढील अर्ध्या वर्षामध्ये जमा करण्यात यावी. मात्र अशा रीतीने जमा करण्यात यावयाची अर्जित रजा दोन्ही मिळून 240 दिवस या कमाल मर्यादेबाहेर जाता कामा नये.

4. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 च्या नियम 54 (3) खालील दुसरे परंतुक वगळण्यात आले आहे.

5. हे आदेश दिनांक 1 जानेवारी, 1997 पासून अंमलात येतील.

6. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 मधील या संबंधातील विद्यमान तरतुदी या शासन निर्णयातील तरतुदीपुरत्या सुधारण्यात आल्या आहेत असे मानण्यात यावे. उपरोक्त नियमांमध्ये रीतसर सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. स. बसनाक,
शासनाचे अवर सचिव.

प्रति,

महालेखापाल-1, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई (80 प्रती),
महालेखापाल-2, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर (80 प्रती),
महालेखापाल-1, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई (40 प्रती),
महालेखापाल-2, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर (40 प्रती),
महालेखापाल, (वाणिज्य लेखापरीक्षा), मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (40 प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (5 प्रती),
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव/उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
विभागीय आयुक्त, मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक/अमरावती,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथपाल 5 प्रती),
निवड नस्ती, कार्यासन सेवा-9, वित्त विभाग.

---

* पत्राने.

---

एच-1024(13,000+10-12-96)-अ.